बेरोजगार अभियंता
यांना कंत्राटी कामे देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शा.नि.क्र. सीएटी १०९७/प्र.क्र.४२/इमारती २
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- २९/७/२००२.

**वाचावे** - १) शा.नि.क्र.सीएटी १०९०/सीआर २१/इमा.२, दि.२ फेब्रुवारी,१९९६
२) शा.नि.क्र.सीएटी १०९६/सीआर ३४८/इमा.२, दि.३ मार्च,१९९७
३) शा.नि.क्र.सीएटी १०९६/सीआर १७२/इमा.२, दि.२०एप्रिल,१९९८
४) शा.नि.क्र.सीएटी १०९७/सीआर ४२/इमा.२, दि.४ मार्च,१९९९

**प्रस्तावना** - शासन निर्णय दि.४ मार्च,१९९९ अन्वये नोंदणी झाल्यानंतर ज्या स्थापत्य अभियंत्यांनी रु. ५.०० लक्षपर्यंतचे एक किंवा तेवढया किंमतीची दिलेले कामे यशस्वीपणे पूर्ण केली आहेत त्यांना यापुढे रु. १०.०० लक्षपर्यंतची अशी एकूण १५.०० लक्ष किंमतीपर्यंतची कामे विनास्पर्धा देणेबाबतची सवलत दिलेली आहे. अशा प्रकारे प्राप्त कामे यशस्वीपणे पूर्ण केल्यानंतरही सुशिक्षित बेरोजगार अभियंता व्यवसायात स्थिर होऊ शकत नसल्यामुळे त्यांना विना स्पर्धा रु. १५.०० लक्ष किंमतीपर्यंतची कामे देण्याची मर्यादा वाढविणेबाबतची मागणी विविध बेरोजगार अभियंता संघटनांनी शासनाकडे केली होती व त्यावर शासनाने सहानुभूतीपूर्वक विचार करुन खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय** - ज्या स्थापत्य सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांनी रु. ५.०० लक्षपर्यंतचे एक किंवा तेवढया किंमतीची दिलेली कामे यशस्वीपणे पूर्ण केली आहेत, त्यांना तद्नंतर रु. २०.०० लक्षपर्यंतच्या किंमतीची दोन किंवा अधिक अशी एकूण रु. २५.०० लक्ष किंमतीची कामे विनास्पर्धा देण्यात यावीत. सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांना काम वाटप करताना त्यांना कंत्राटदार नोंदणी वर्ग ६ साठीच्या मर्यादेपर्यंत म्हणजे रु. १५.०० लक्ष किंमतीपर्यंतचे काम देण्यात यावे.

२. सुशिक्षित बेरोजगार अभियंते हे जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात नांव नोंदणी केलेले असावेत.

३. पदविकाधारक (स्थापत्य व विद्युत) सुशिक्षित बेरोजगार अभियंत्यांनी कामासाठी अर्ज करताना त्यांनी पदवी अभ्यासक्रमास प्रवेश घेतलेला नाही असे शपथपत्र सादर करणे बंधनकारक राहिल.

४. जे सुशिक्षित बेरोजगार अभियंते स्वतःच्या नांवावर कामे घेऊन इतरांना कामे देतील किंवा काम सोडून देतील त्यांची नांवे नोंदणीकृत यादीतून रद्द करण्यात यावीत व याबाबत कडक उपाययोजना अवलंबवावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( शि. वि. तामखडे )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

D:\CAT 1097-CR42-BD2-GR..doc
एच - ६३९ (९५००-८-०२)

प्रति,

मा. मुख्यमंत्री, ह्यांचे प्रधान सचिव,
मा. मंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (सा.बां.)/पाटबंधारे ह्यांचे खाजगी सचिव,
वित्त विभाग/सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,
महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर,
महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
सचिव (रस्ते)/सचिव (बांधकाम), सार्वजनिक बांधकाम विभाग, ह्यांचे स्वीय सहाय्यक,
पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय,

प्रत, माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी,

सर्व मुख्य अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
मुख्य अभियंता, बृहन्मुंबई क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई, महाराष्ट्र,
गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण (म्हाडा), मुंबई,
महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, मुंबई,
व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ, (सिडको), निर्मल बिल्डीग, नरीमन पॉइंट, मुंबई/महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई,
पाटबंधारे विकास महामंडळ, कृष्णा/तापी/गोदावरी/विदर्भ,
महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, एक्सप्रेस टॉवर्स, मुंबई,
आयुक्त, सर्व महानगरपालिका (२ प्रतींसह),
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषदा,
अधीक्षक अभियंता, व प्रादेशिक अधिकारी, भूपृष्ठ वाहतूक मंत्रालय (MOST),चेंबूर, मुंबई,
सर्व अधीक्षक अभियंते, सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग,
अधीक्षक अभियंता, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, वरळी, मुंबई/महानगरपालिका,ठाणे/पुणे/कल्याण,
संचालक, उपवने आणि उद्याने, मुंबई,
प्रतिनियुक्तीवरील सर्व अधिकारी,
सर्व कार्यकारी अभियंते,सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग/जिल्हापरिषद,
सर्व अधिकारी/कार्यासन अधिकारी,सा.बां.विभाग/पाटबंधारे विभाग, मंत्रालय,
कार्यासन इमारती-२ (निवड नस्ती).

— x —

एच- ६३९ (१५०० - ८-०२)

D:\CAT 1097-CR42-BD2-GR..doc